प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण (PM-POSHAN) योजनेतंर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा निधी पुनर्विनियोजनाव्दारे वितरीत करण्याबाबत... (सन २०२४-२५)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२५/प्र.क्र.६५/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: ३१ मार्च, २०२५

वाचा:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.१८४/एस.डी.३, दि.०८ मे, २०२४.

२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२३/प्र.क्र.९२/एस.डी.३, दि.१४ ऑगस्ट, २०२४.

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.०७ ऑक्टोंबर, २०२४.

४) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.१० ऑक्टोंबर, २०२४.

५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.२० फेब्रुवारी, २०२५.

६) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.१८ मार्च, २०२५.

७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.२५ मार्च, २०२५.

८) केंद्र शासन आदेश क्र.F.No.३-४/२०२४-PMP-५, दि.२६ मार्च, २०२५.

९) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२४/प्र.क्र.१२५/एस.डी.३, दि.२७ मार्च, २०२५.

१०) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, शासन निर्णय क्र.पुनर्वि -२८२४/ प्र.क्र.९९/ अर्थसंकल्प (१) दि.३१ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत दि.२६ मार्च, २०२५ रोजीच्या आदेशान्वये केंद्र शासनामार्फत चौथ्या हप्त्याचा केंद्र हिस्स्याचा रु.२८९८५.८६ लक्ष इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. उपरोक्त केंद्र हिस्स्याच्या निधीपैकी सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.२५३३३.६४ लक्ष इतका निधी व राज्य हिस्साचा रु.१९३७५.४४ लक्ष असा एकूण रु.४४७०९.०८ लक्ष इतका निधी वितरीत करणे आवश्यक होते. तथापि, सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र व राज्य हिस्स्याच्या सुधारित अर्थसंकल्पिय तरतूदीमधून शिल्लक निधी विचारात घेता, केंद्र हिस्स्याचा संपूर्ण रु.२५३३३.६४ लक्ष व राज्य हिस्स्याचा रु.६०४८.५९ लक्ष असा एकूण रु.३१३८२.२३ लक्ष इतका निधी शासन निर्णय दि.२७ मार्च, २०२५ अन्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच, सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा अवितरीत निधी रु.१३३२६.८५ लक्ष इतका निधी विभागातील समग्र शिक्षा व स्टार योजनांमधील शिल्लक असलेल्या तरतूदीमधून निधी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याची विनंती नियोजन विभागामार्फत वित्त विभागास करण्यात आली होती. त्यानुषंगाने संबंधित विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा रु.१३३२६.८५ लक्ष इतका निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याकरीता पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध झालेला रु.१३३२६.८५ लक्ष (रुपये एकशे तेहतीस कोटी सव्वीस लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त) इतका निधी खालील लेखाशिर्षामधून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लक्ष)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२४-२५ मधील सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद | पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करण्यात आलेला निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, (०१) (१६) प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पीएम-पोषण) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२०२ ३८१५) | रु.६०००० | रु.१३३२६.८५ | रु.१३३२६.८५ |
| | **एकूण** | **रु.६००००** | **रु.१३३२६.८५** | **रु.१३३२६.८५** |

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५५०/२०२५/व्यय-५, दि.३१ मार्च, २०२५ अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या दि.२६ मार्च, २०२५ रोजीच्या निधी वितरण आदेशामध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींचे तसेच, वित्त विभाग शासन परिपत्रक दि.०८ जानेवारी, २०२५, दि.१२ फेब्रुवारी, २०२५ व दि.१७ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

४. सदर निधी केंद्र व राज्य शासनने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/ परिपत्रक/ सूचना यांना अनुसरुन विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. प्रस्तुत निधीच्या उपयोजनाकरीता आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी तसेच, राज्य समन्वय अधिकारी, प्रधानमंत्री पोषण शक्ती निर्माण योजना, स्वतंत्र कक्ष, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३१२०१६१८२३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2025.03.31 20:16:57 +05'30'

**(प्रमोद पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य

७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१९) नियोजन विभाग, कार्यासन १४७१, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती - एस.डी. ३